**राष्ट्रीय असंसर्गजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ करीता भंडारा, वर्धा, चंद्रपूर, सातारा व जालना जिल्हा रुग्णालयांमध्ये स्थापन करावयाच्या Chronic Kideny Disease (CKD) & Chronic Obstructive Pulmonary Disease (COPD) कक्षामध्ये उपकरणे खरेदीस प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१०१८/प्र.क्र.४९४/आ -७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २२ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :-

सह संचालक (असंसर्गजन्य रोग), आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/NCD/ न.क्र.३२२-१/ COPD /प्रशासकीय मान्यता/२६६६/२०१८, दिनांक १ ऑगस्ट, २०१८.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनामार्फत राष्ट्रीय असंसर्गजन्यरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ प्रकल्प अंमलबजावणी कार्यक्रम (पीआयपी) अंतर्गत जिल्हा रुग्णालय भंडारा, वर्धा, चंद्रपूर, सातारा व जालना येथे Chronic Kidney Disease (CKD) and Chronic Obstructive Pulmonary Disease (COPD) कक्षामध्ये आवश्यक असलेल्या उपकरणे खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सह संचालक (असंसर्गजन्य रोग), आरोग्य सेवा, मुंबई यांच्या संदर्भीय दिनांक १ ऑगस्ट, २०१८ च्या पत्राच्या अनुषंगाने केंद्र शासनामार्फत राष्ट्रीय असंसर्गजन्यरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ PIP ला मान्यता प्राप्त झालेली आहे. त्यानुषंगाने जिल्हा रुग्णालय भंडारा, वर्धा, चंद्रपूर, सातारा व जालना येथे Chronic Kidney Disease (CKD) and Chronic Obstructive

Pulmonary Disease (COPD) कक्षामध्ये आवश्यक असलेल्या उपकरणे खरेदीस अनुक्रमे रु.७३.३० लक्ष इतक्या निधीच्या निविदा प्रक्रियेस प्रशासकीय मान्यता देण्यात आहे.

२. जिल्हा रुग्णालय भंडारा, वर्धा, चंद्रपूर, सातारा व जालना येथे Chronic Kidney Disease (CKD) and Chronic Obstructive Pulmonary Disease (COPD) कक्षामध्ये आवश्यक असणारी उपकरणांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| Sr. No. | Equipment | Demand Received from 5 District | Actual Supply to be given | Unit Cost (in INR) | Total Budget Required (in Lakhs) |
|---|---|---|---|---|---|
| 1 | Portable Spirometer | 8 | 8 | 50000 | 400000 |
| 2 | Pulmonary Fuction Test Machine | 8 | 8 | 200000 | 1600000 |
| 3 | Pulmonary oximeter cum Capnograph | 7 | 7 | 150000 | 1050000 |
| 4 | Finger Pulse Oximeter | 36 | 36 | 2000 | 72000 |
| 5 | Non Invasive Ventilator | 23 | 23 | 50000 | 1150000 |
| 6 | Invasive Ventilator | 7 | 3 | 1000000 | 3000000 |
| 7 | Nebuliser | 39 | 39 | 1500 | 58500 |
| | | | | | **7330500** |

३. सदरची प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) सदर उपकरणांची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू उपकरणांचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदरहू खरेदीसाठी आवश्यक असणारा रु. ७३,३०,५००/- (रुपये त्र्याहत्तर लक्ष तीस हजार पाचशे फक्त) एवढा खर्च FMR Code 6.1.1.23.e या घटकांतर्गत सन २०१८-१९ मध्ये मंजूर केलेल्या व उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

४. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२२११३९५२७७१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S. A. Pedgaonkar

Digitally signed by S. A. Pedgaonkar
DN: CN = S. A. Pedgaonkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice And Special Assistance Department
Date: 2018.11.29 15:58:08 +05'30'

( सु. अ. पेडगांवकर)
अवर सचिव

प्रति,
१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

प्रत :-
१) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
२)अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
३) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
४) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
५) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
६) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
७)सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
८) निवडनस्ती (आरोग्य-७)